यावर राधाबाईच्यानें खरोखर मनापासून कांहींच हरकत घेतां येईना. अण्णासाहेबांनीं राधाबाईविषयीं काढलेले स्तुतिपर उद्गार जितके खरे होते, तितकीच कुसुम राधाबाईची सून व्हावी अशी त्यांची मनापासून इच्छा होती; आणि गंगाधराचें कुसुमशीं लग्न व कृष्णाला जपानाला पाठविणें या दोन्ही गोष्टी निखालस आपल्या मुलांच्या कल्याणाच्या आहेत, हें समजण्याइतका शहाणपणा राधाबाईत होता. तेव्हां राधाबाई हरकत तरी कोणती घेणार? तथापि त्यांनीं एकदा ह्मणून पाहिलें, कीं, "आह्मी गरीब आहों, आमच्या घरांत चांदीसोन्याचा विटाळहि नाहीं, हें तुह्मी पहातच आहां. तुह्मांला परमेश्वरानं सर्व तऱ्हेनं अनुकूलता दिली आहे, तर कुसुमला एखादं आपल्या तोलाचं मोठं ठिकाण पाहून तिथं न देतां आह्मां गरिबांच्या इथं देण्यासारखं आमच्यापाशीं काय आहे?"

त्यावर लक्ष्मीकाकू ह्मणाल्या "श्रीमंतांच्या इथं नाहीं तें तुमच्या इथं आहे, ह्मणून तर कुसुम तुमच्याच घरीं पडावी असं वाटतं. श्रीमंतांच्या घरीं पैसा असतो, पण खरी माया कांहीं पैशानं येत नाहीं. दुसरं, श्रीमंतांचीं मुलं बहुधा द्वाड, छांदिष्ट, विद्याहीन आणि वाईट नादीं लागलेलीं असतात. अशा घरीं देण्यापासून कुसुमला काय सुख लागणार आहे? तुमच्या घरचं वळण, मुलाचा स्वभाव व विद्या, आणि तुमच्यासारखी मायाळू सासू मिळाल्यावर मुलीला मीठभाकरीहि पक्वान्नांसारखी गोड लागेल. ही तुमची श्रीमंती 'श्रीमंत लोकांनीं खरोखर हेवा करण्यासारखी आणि चोरांनां लुटून न नेतां येणारी आहे,' असं तिकडे नेहमीं ह्मणायचं! अन् तें माझ्याहि मनाला अगदीं पटतं."

यावर काय उत्तर द्यावें तें राधाबाईला कळेना. त्या ह्मणाल्या "अण्णासाहेबांच्या व तुमच्या आशीर्वादानं गंगाधराला हे दिवस दिसत आहेत. आह्मी सर्व तुमचीं जन्माचीं ऋणी आहों. त्यांत आजच्या या दोन गोष्टी करण्याचं मनांत आणून तुह्मी भर घालूं इच्छित आहां. आपल्या इच्छेच्या विरुद्ध जाण्याची आमच्यांत शक्ति नाहीं व तसं करणं आमचा धर्महि नाहीं. अण्णासाहेबांची आज्ञा आह्मांला शिरसावंद्य आहे. याहून अधिक काय सांगावं व आपली मनांतली कृतज्ञता कोणत्या शब्दांनीं बोलून दाखवावी, तें मला कळत नाहीं."

राधाबाईचा हा रुकार पडतांच लक्ष्मीबाईला अत्यानंद झाला. नंतर इकडच्या तिकडच्या थोड्याशा गोष्टी झाल्यावर लक्ष्मीबाई कुंकूं लावून निरोप घेऊन चालत्या झाल्या.

लग्नाचे मुहूर्त जवळच होते. त्यांपैकीं एका सुमुहूर्तावर गंगाधर आणि कुसुम यांचें लग्न लागलें. अण्णासाहेब गंगाधरासारख्या गरीब मुलाला आपली मुलगी देतील, असा कोणाचा अंदाज नव्हता. कोणातरी गर्भश्रीमंत जहागिरदार, इनामदार, जमीनदार वगैरे दारांच्या घरीं अण्णासाहेबांची मुलगी पडून संपत्ती-कडे संपत्ति आकर्षिली जाईल, असें सर्वांनां वाटलें होतें; परंतु तसें कांहींएक न घडतां अण्णासाहेबांनीं गंगाधरालाच पसंत केल्याचें पाहून पुष्कळांनां आश्चर्य, बऱ्याच जणांनां हेवा, आणि फार थोड्यांनां कौतुक वाटलें! या लग्नांत त्रिंबकराव व गोदूताई पानसुपारीला किंवा हळदीकुंकवालासुद्धां आल्या नाहींत! त्यांनां कृतकर्माचा पुरापुरा पश्चात्ताप होऊन गंगाधराला व एकंदर लोकांनां तोंड दाखविण्याची शरम वाटूं लागली होती. अण्णासाहेबांनीं दोन्हींकडचा खर्च व सालंकृत कन्यादान केलें व मुलीच्या नांवानें अर्धी इस्टेट करून दिली. हा विवाहसमारंभ सामान्य प्रतीचा—विशेषसा थाटमाट न करतां—उरकण्यांत आला व थाटमाटासारख्या गोष्टींत जी रक्कम खर्चीं पडली असती ती वेगळी काढून तिच्यांतून संस्कृत पाठशाळेंतल्या मुलांनां स्कालरशिपा व मधुकऱ्यांसाठीं एक लहानसें उन्हाळ्यापुरतें अन्नछत्र उघडण्यांत आलें.

गंगाधराचा विवाह झाल्यावर लवकरच कृष्णाची जपानाला जाण्याची तयारी झाली, हें सांगावयास नकोच.

---

## प्रकरण चौसष्टावें.

## गूढ उकललें !

आतां इकडे त्रिंबकरावांच्या मुलांची काय हकीगत आहे ती आपण पाहूं. वडील मुलगा बाबासाहेब हा वारंवार कर्जबाजारी होऊन बसे आणि समन्स निघालें ह्मणजे तोंडचुकवाचुकवी करी. शेवटीं एकदा दिवाणी तुरुंगाची हवा त्यानें पाहिलीच! वामन हा अगदीं लहान होता, तथापि मुलाचे पाय पाळण्यांत दिसतात अशी ह्मण आहे, त्या ह्मणीप्रमाणें आतां लहान वयांतच त्यानें शाळा सोडून देऊन उनाडपणा पतकरला होता; यावरून पुढें त्याचें काय होणार, याचा साधारण अंदाज कोणालाहि करतां येईल. रहातां राहिला शिदू. यानें तर शिवापुरांत चांगलेंच नांव गाजविलें होतें. खुनाच्या आरोपांतून जरी तो सुटला, तरी लोकांत तोंड दाखवावयाला त्याला शरम वाटूं लागली. रस्त्यांतल्या पोरांनां आणि बायांनां कोर्टांचे निवाडे काय होत? त्यांनीं शिदू रस्त्यानें जाऊं लागला

ह्मणजे "हा पहा आपल्या भावाचा गळा कापणारा," असें स्पष्ट ह्मणावें, आणि त्याची छीः थूः करावी. शिदू निगरगट्ट स्वभावाचा होता, तरी रात्रंदिवस अशा तऱ्हेनें जो तो त्याची संभावना करूं लागल्यामुळें तो अगदीं त्रासून गेला होता. तशांत, आतां त्रिंबकरावांनीं त्याला साफ सांगितलें कीं, घरांत होतें नव्हतें तें तुझ्या बचावाचे पायीं वकिलांनां दिलें. आतां तुह्मांला खाऊं घालण्यास मजजवळ कांहीं उरलें नाहीं, यासाठीं आतां तूं आपली पोटापाण्याची सोय पाहून वेगळा रहा! डांबिस ह्मणून ठरलेल्याला सरकारी किंवा खासगी नोकरी तरी कोण देणार? शिदू नोकरी शोधतां शोधतां आणि मोठ्यांचे उंबरठे झिजवितां झिजवितां अगदीं कंटाळून गेला. एके दिवशीं त्याला वर्तमानपत्रांत सहज एक जाहिरात दिसली. दक्षिणआफ्रिकेंत जर्मन वसाहतींत रेलवेच्या कामावर कांहीं लोक पाहिजेत असा त्या जाहिरातीचा मतलब होता. त्या रेलवेकंपनीचा एक एजंट मुंबईस आला होता, त्याच्याशीं पत्रव्यवहार करून एक तीस रुपयांची जागा शिदूनें मिळविली, आणि कोणाला न कळवितां एके दिवशीं मुकाट्यानें आपले दोनचार कपडे व एकदोन भांडीं एवढें घेऊन स्वारीनें प्रयाण केलें. शिदू गेल्याबद्दल प्रथम गांवांत थोडासा गवगवा झाला, आणि थोड्याशा कंड्याहि पिकल्या. पण पुढें लवकरच लोक त्याला विसरले. त्रिंबकरावांनीं मुलगा कोठें गेला याविषयीं विशेषशी चौकशी केली नाहीं. वर्ष दीड वर्षानें आफ्रिकेंतून त्रिंबकरावांच्या नांवचें एक पत्र आलें. त्यांत पुढील मजकूर होताः—

"वडिलांचे चरणीं बालकें शिदू यांचे शिरसाष्टांग नमस्कार. मी एकाएकीं कोणाला न कळवितां न विचारतां निघून आलों, ह्मणून वडिलांनां फार दुःख झालें असेल; परंतु या जगांत जसें पेरावें तसें उगवतें, हा नियम आहे. माझी स्वदेशीं चोहोंकडे छी थूः होऊन अखेर पोटाकरितां मला इतकें लांब यावें लागलें व हमाली करून कसेतरी आठचार आणे पोटाला मिळवावे लागत आहेत, याबद्दलचा सगळा दोष लहानपणीं आमचे केलेले लाड, आमच्या डोक्यांत मोठेपणाविषयींच्या भरविलेल्या विचित्र कल्पना आणि निरुद्योगी राहून मौजा मारण्याची लागलेली चटक, यांचेकडे आहे. त्याच वेळेस आह्मांला चांगलें वळण मिळालें असतें, तर गंगाधरासारखे आह्मी नांवालौकिकाला चढलों नसतों काय? पण दुर्दैव आमचें, कीं, आह्मांला या स्थितीला आणून पोंचविणारीं आईबापें मिळालीं! मी आतां परदेशांत राहूं लागल्यापासून स्वतःची खरी किंमत ओळखूं लागलों आहें, आणि उद्योगाच्या आणि नेकीच्या बळावर मनुष्याला काय करतां येईल, तें मला येथें लोकांचीं उदाहरणें पाहून कळूं लागलें आहे. जों जों मी या गोष्टीचा अधिकाधिक विचार करितों, तों तों आह्मांला

लहानपणीं मिळालेल्या शिक्षणाविषयीं अधिक खेद वाटून तसलें वळण लावणारे आपले आईबाप नव्हेत, तर मागच्या जन्मींचे वैरी आहेत असें वाटूं लागतें. धन्य त्या राधाबाईची ! तिचीं लेंकरें किती भाग्यवान् झटलीं पाहिजेत ! तिच्यासारखी आई आह्मांला मिळाली नाहीं, म्हणून आतां कितीहि शोक केला, तरी काय होणार आहे ? आमच्या नशिबीं आतां ही हमाली लागली ती थोडीच सुटणार आहे ! भावाचा खून करणारा खरोखर मीच ! माझी मान तुम्हीं फांसांतून सोडविली ती असली हमाली करावयास, आणि कृतकर्माबद्दल पश्चात्तापानें जळून खाक होण्यासाठींच काय? माझ्याकरितां त्या सोनीला बिचारीला किती छळवाद सोसावा लागला असेल ! तिच्या भोळ्या स्वभावाचा फायदा घेऊन म्यां दुष्टानें तिला व्यर्थ लोकनिंदेच्या जाळ्यांत फसविलें ! आणखी माझ्या हातून जीं कित्येक घोर पातकें घडलीं आहेत, त्यांचें वर्णन करणें येथें काय उपयोग ? माझ्या मनाला तितक्या टांचण्या सदोदित बोंचत आहेत. कृतकर्माबद्दल अशा रीतीनें रात्रंदिवस शिक्षा भोगीत मी राहिलों आहें ! आतां जन्मभूमीचें दर्शन मला पुनः कधीं होईल असें वाटत नाहीं. झालें तरी माझ्या सर्वस्वी नाशास कारण झालेल्या मातापितरांचें पुनः दर्शन घेण्यास माझे डोळे इच्छित नाहींत. आतां परमेश्वराजवळ माझी एकच प्रार्थना आहे, कीं, परमेश्वरा ! तूं दुसरी हवी ती शिक्षा आह्मांला दे, पण असले आईबाप पुनः देऊं नकोस !

आपला अभागी पुत्र **शिदू.**"

या पत्रांतील प्रत्येक अक्षर त्रिंबकरावांच्या आणि गोदूताईच्या दुःखित अंतःकरणावर डागण्या देत होतें. त्रिंबकरावांच्यानें तें सबंध वाचवेना, इतकें त्यांचें हृदय दुःखावेगानें आणि पश्चात्तापानें भरून आलें. राधाबाईचीं मुलें अत्यंत गरिबींत आणि संकटांत दिवस काढीत होतीं त्यांनीं भाग्य काढावें, आणि आपल्या मुलांना लहानपणापासून थाटानें रहाण्याची व सुख भोगण्याची सवय झाली असून अखेर त्यांच्या दैवीं अशा प्रकारची विपत्ति यावी, हें गोदूताईला मोठें गूढ पडलें होतें; आज शिदूच्या पत्रानें तें गूढ उकललें. मुलें चांगलीं किंवा वाईट निघणें, हें आईबापांच्या सांपत्तिक स्थितींवर एवढें अवलंबून नसून त्यांच्या शिक्षणावर, त्यांनीं लाविलेल्या वळणावर सर्वथा अवलंबून आहे, हें आतां गोदूताईला चांगलें कळलें आणि '**दुःखाअंतीं सुख**' ही ह्मण त्या पुनः कधींहि विसरल्या नाहींत.

